सामान्य प्रशासन विभाग (खुद्द) साठी लागणारे रिसायकलिंग टोनर पुरविण्याकरिता केलेला दरकरार रद्द करण्याबाबत लिस्टा ॲण्ड कंपनी, बेलार्ड इस्टेट, मुंबई.

# महाराष्ट्र शासन

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्र. संसाख-२०१९/प्र.क्र.५४/कार्यासन-२४,**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांकः-१५ फेब्रुवारी, २०२०

वाचा :- सा.प्र.वि.शा.नि.क्र. संसाख-२०१९/प्र.क्र.५४/कार्या-२४,दिनांक ३०.११.२०१९

**प्रस्तावनाः-**

रिसायकलिंग टोनरचा पुरवठा करण्यासाठी पुरवठादार म्हणून लिस्टा ॲण्ड कंपनी, मुंबई यांची संदर्भाधिन शासन निर्णय, दिनांक ३०.११.२०१९ अन्वये नियुक्ती करण्यात आली होती. आता, शासनाने याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णयः-**

सामान्य प्रशासन विभाग (खुद्द) ला सन २०१९-२०२० या कालावधीत लागणाऱ्या रिसायकलिंग टोनरचा पुरवठा करण्यासाठी लिस्टा ॲण्ड कंपनी, बेलार्ड इस्टेट, मुंबई यांची दि. ०१.१२.२०१९ ते दि.३०.११.२०२० या कालावधीसाठी शासन निर्णय, दि. ३०.११.२०१९ अन्वये नियुक्ती करण्यात आली होती.

२. सदर शासन निर्णयातील तरतुदीनुसार सामान्य प्रशासन विभाग (खुद्द), मंत्रालय यांना रिसायकलिंग टोनरचा पुरवठा करण्यासाठी निविदा सूचनेतील सर्व अटी व शर्तीचे पालन करणे लिस्टा ॲण्ड कंपनी, मुंबई पुरवठादार यांना बंधनकारक आहे. तथापि, असे निदर्शनास आले आहे की, लिस्टा ॲण्ड कंपनी, मुंबई यांच्याकडून निविदा सूचनेतील अटी शर्तीमधील अ. क्र.१० तसेच त्यांनी शासनाशी झालेल्या करारपत्रातील अ.क्र.११ मधील अटी व शर्तीचे पालन केलेले नाही. त्यानुषंगाने, दरपत्रक स्विकृतीच्या कोणत्याही टप्प्यावर दरकरार रद्द करण्याचा अधिकार शासनास असल्याने, शासन निर्णय, दि. ३०.११.२०१९ अन्वये लिस्टा ॲण्ड कंपनी, मुंबई यांचा शासनाशी झालेला दरकरार याव्दारे रद्द करण्यात येत आहे. त्याचप्रमाणे शासनाकडे जमा केलेली सुरक्षा अनामत (Bank Guarantee) बँक हमी पत्र जप्त करण्यात येत आहे. तसेच दि. १.१२.२०१९ ते नवीन करार अस्तित्वात येईपर्यंत लिस्टा ॲण्ड कंपनी, मुंबई यांचेकडून पुरवठा करण्यात आलेल्या / येणाऱ्या टोनरच्या रिसायकलिंग पोटी देय होणारी रक्कम त्यांना अदा करण्यात येणार नाही.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००२१५१२१०५४३३०७ असा आहे. हा शासन निर्णय, डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHWETAMBARI PRAVIN KHADE

Digitally signed by SHWETAMBARI PRAVIN KHADE
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=9d702814ac9e8ff679064b8a4828e61adaa1acd78f420928f8e5191c2576b1a1,
postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=8e3cff5145f3538cc2fd3c8534f86eeb0ca96ee4f337faf9d77ef01a5cc23b6b, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SHWETAMBARI PRAVIN KHADE
Date: 2020.02.15 12:14:26 +05'30'

**( श्वे. प्र. खडे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई

२) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई

३) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे वरिष्ठ स्वीय सहायक

४) सामान्य प्रशासन विभागातील सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव

५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

६) लिस्टा ॲण्ड कंपनी, बेलार्ड इस्टेट, मुंबई- ४०००३८

७) उप सचिव (कार्या-२४), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई

८) कार्यासन-२६/कार्यासन-१९/कार्यासन-२४.